पुणे विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा, वर्ग-३ मधील कर्मचाऱ्यांच्या महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मध्ये तात्पुरत्या स्वरुपात निवडीने नियुक्त्या देणे.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**आदेश क्रमांकः मविसे-१०/२०१४/प्र.क्र.१८८/आस्था-३अ**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१

तारीख: ११ सप्टेंबर, २०१४

संदर्भ :-

1) **शासन आदेश, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्रमांकः मविसे-१०/२०१४/प्र.क्र.८५/ आस्था-३अ, दिनांक २५.८.२०१४**
2) **शासन आदेश, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्रमांकः मविसे-१०/२०१४/प्र.क्र.१७५/ आस्था-३अ, दिनांक ६.९.२०१४**

**आदेश:-**

उपरोक्त संदर्भीय क्र.१ च्या शासन आदेशान्वये श्री.भानुदास शाहू साळवे यांना सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, खेड, जिल्हा पुणे या पदावर आणि श्री.विनायक जगन्नाथ गुळवे यांना सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, भोर, जिल्हा पुणे या पदावर तदर्थ पदोन्नतीने तात्पुरत्या स्वरुपात पदस्थापना देण्यांत आली होती. तसेच, संदर्भीय क्र.२ च्या शासन आदेशान्वये श्री.विनायक जगन्नाथ गुळवे यांच्या उपरोक्त आदेशात अंशत: बदल करुन त्यांना सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, दौंड, जिल्हा पुणे या पदावर पदस्थापना देण्यात आली आहे. सबब, श्री.भानुदास शाहू साळवे यांच्या उपरोक्त आदेशात अंशत: बदल करुन त्यांना खालीलप्रमाणे तात्पुरत्या स्वरुपात सुधारित पदस्थापना देण्यांत येत आहे:-

| अ. क्र. | नाव | तदर्थ पदोन्नतीने दिलेली पदस्थापना | सुधारित पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.भानुदास शाहू साळवे | सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, खेड, जिल्हा पुणे | सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, भोर, जिल्हा पुणे | दि.२५.८.२०१४ च्या आदेशात अंशत: बदल करुन रिक्त पदी. |

२. उपरोक्त बदलाव्यतिरिक्त दि.२५.८.२०१४ च्या आदेशातील क्र.२ येथे नमूद इतर अटी व शर्ती कायम राहतील.

३. संबंधित अधिकाऱ्याने त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा,

दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन पदस्थापना रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

४. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पदस्थापना दिलेल्या वरील नमूद अधिकाऱ्यास त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्याच्या सूचना द्याव्यात.

५. संबंधित अधिकाऱ्याने नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१११४०६०८९८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Patil Ravindra Namdev

Digitally signed by Patil Ravindra Namdev
DN: CN = Patil Ravindra Namdev, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.09.11 18:19:38 +05'30'

**(रविंद्र पाटील)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल-१ ( लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
२. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे
४. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे
५. खाजगी सचिव, मा. मंत्री, (ग्राम विकास)
६. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, (ग्राम विकास)
७. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक
८. संबंधित अधिकारी (द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे)
९. कार्यासन क्रमांक आस्था-२/ आस्था-३ /योजना -५ / ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.